**अंगणवाडी केंद्र इमारतीमध्ये शौचालयाचे बांधकाम करणे व पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी अर्थसंकल्पित केलेला निधी खर्च करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. एबावि-२०१९/प्र.क्र. २८९/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २१ नोव्हेंबर, २०१९

**वाचा** (१) महिला व बाल विकास विभाग,शा.नि. क्र.एबावि-२००७/प्र.क्र.३४८/का.६, दिनांक ३० जून , २०१८
(२) महिला व बाल विकास विभाग,शा.नि. क्र.एबावि-२०१८/प्र.क्र.४०८/का.६, दिनांक ५ डिसेंबर, २०१८
(३) महिला व बाल विकास विभाग केंद्र शासनाचे पत्र क्र.F.No.CD-१४/७/२०१७-CD.II, दिनांक १ मार्च,२०१९
(४) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०१९
(५) महिला व बाल विकास विभाग, शासन परिपत्रक क्र.बीजीटी-२०१९/प्र.क्र.१४/का.४, दि.१०/४/२०१९
(६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८/७/२०१९
(७) महिला व बाल विकास विभाग, पत्र क्र.बीजीटी-२०१९/प्र.क्र.२९/का.४, दि.११/७/२०१९
(८) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे पत्र जा.क्र.एबाविसेयो/का-३/ शौचालय-पिण्याचेपाणी-तरतूद/५५९९/१९-२०, दिनांक २३/१०/२०१९

**शासन निर्णय:-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना असून या योजनेची सुरुवात सन १९७५ पासून महाराष्ट्र राज्यात झाली. क्रमाक्रमाने योजनेच्या प्रकल्प संख्येत वाढ होऊन राज्यातील विविध नागरी, ग्रामीण व आदिवासी क्षेत्रात प्रकल्प कार्यन्वीत करण्यात आलेले आहेत. या योजनेअंतर्गत अंगणवाडीच्या माध्यमातून बालके, गरोदर स्त्रिया व स्तनदा माता यांना ६ महत्त्वाच्या सेवा उदा. लसीकरण, पूर्व प्राथमिक शिक्षण, पुरक पोषण आहार, संदर्भ सेवा, आरोग्य तपासणी, १५ ते ४५ वयोगटातील स्त्रियांना आरोग्य व पोषण विषयक शिक्षण, इत्यादीचा सेवा पुरविण्यात येतात.

२. महिला व बाल विकास विभाग,शा.नि. क्र.एबावि-२०१७/प्र.क्र.३४८/का.६ दिनांक ३० जून , २०१८ च्या शासन निर्णयान्वये केंद्र शासनाने निर्धारित केल्याप्रमाणे स्वत:च्या मालकीच्या अंगणवाडी केंद्र इमारतीमध्ये शौचालयाचे बांधकाम करणे करीता प्रति अंगणवाडी केंद्र रु.१२,०००/- व पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्याकरीता प्रति अंगणवाडी केंद्र रु.१०,०००/- याप्रमाणे सुधारित दर लागू करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे. त्यानुसार राज्यातील स्वत:च्या मालकीच्या अंगणवाडीमध्ये शौचालय बांधकाम करणे व पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्यास दिनांक ५ डिसेंबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. केंद्र शासनाने संदर्भाधीन क्रमांक-३ येथील दिनांक १/०३/२०१९ च्या आदेशान्वये स्वत:ची मालकी असलेल्या ज्या

अंगणवाडी केंद्रांना शौचालय सुविधा नाही अशा अंगणवाडी केंद्राना शौचालय बांधकाम करण्याकरीता रु.२८२.३० लाख (२८२३ अंगणवाडी केंद्र) एवढा निधी व पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी रु.६५५.८० लाख (५४६५ अंगणवाडी केंद्र) एवढा निधी असा एकूण रु.९३८.१० लाख एवढा निधी मंजूर केला आहे. सदर प्रयोजनासाठी केंद्र व राज्य हिस्सा याचे प्रमाण ६०:४० असे आहे. त्यानुसार केंद्र शासनाने त्यांच्या हिश्श्यातील रु.५६२.८६ लाख एवढा निधी सन २०१८-१९ या वर्षाकरीता उपलब्ध करुन दिलेला आहे.

३. सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता सदर प्रयोजनाखाली अर्थसंकल्पित केलेल्या निधीपैकी खालीलप्रमाणे निधी रु.५६२.८६ लाख एवढा निधी खाली नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहून खर्च करण्यास आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना शासन मंजूरी देत आहे.

(रुपये लाखात)

<table>
<tr><th>अ. क्र.</th><th>योजना</th><th>केंद्राकडून त्यांच्या हिश्श्यातील प्राप्त निधी</th><th>लेखाशिर्ष</th><th>बाब</th><th>अर्थसंकल्पित निधी</th><th>वितरीत करावयाचा निधी</th></tr>
<tr><td>१</td><td>२</td><td>३</td><td>४</td><td>५</td><td>६</td><td>७</td></tr>
<tr><td rowspan="4">१</td><td rowspan="4">अंगणवाडयांमध्ये पिण्याच्या पाण्याची सुविधा पुरविणे</td><td rowspan="4">१६९.३८</td><td rowspan="2">२२३६-२०२१ (केंद्र हिस्सा ६०%)</td><td>२७-लहान बांधकामे</td><td>३००.००</td><td>६३.५२</td></tr>
<tr><td>५०-इतर खर्च</td><td>१८०.००</td><td>३८.११</td></tr>
<tr><td rowspan="2">२२३६-२०३९ (राज्य हिस्सा ४०%)</td><td>२७-लहान बांधकामे</td><td>२००.००</td><td>४२.३४</td></tr>
<tr><td>५०-इतर खर्च</td><td>१२०.००</td><td>२५.४१</td></tr>
<tr><td rowspan="4">२</td><td rowspan="4">अंगणवाडयांमध्ये शौचालय बांधकामे करणे</td><td rowspan="4">३९३.४८</td><td rowspan="2">२२३६-२०४८ (केंद्र हिस्सा ६०%)</td><td>२७-लहान बांधकामे</td><td>४५०.००</td><td>१८६.३७</td></tr>
<tr><td>५०-इतर खर्च</td><td>१२०.००</td><td>४९.७२</td></tr>
<tr><td rowspan="2">२२३६-२०५७ (राज्य हिस्सा ४०%)</td><td>२७-लहान बांधकामे</td><td>३००.००</td><td>१२४.२५</td></tr>
<tr><td>५०-इतर खर्च</td><td>८०.००</td><td>३३.१४</td></tr>
<tr><td></td><td></td><td>९३८.१०</td><td></td><td></td><td>१७५०.००</td><td>५६२.८६</td></tr>
</table>

**अटी व शर्ती :-**

१. सदर निधी सन २०१८-१९ मध्ये केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिलेला असल्यामुळे तो सन २०१९-२० मध्ये खर्च करण्यास केंद्र शासनाकडून सदर अखर्चित निधी Revalidate करुन घेण्याची कार्यवाही आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांनी करुन नंतरच निधी खर्च करण्याची कार्यवाही करावी.

२. राज्यातील ४ आकांक्षित जिल्हे (उस्मानाबाद, नंदुरबार, वाशिम व गडचिरोली) व मेळघाट आणि तत्सम कुपोषण भागाकरीता सदर प्रयोजनाखाली उपलब्ध करुन दिलेला निधी सर्व प्राथम्याने उपलब्ध करुन देण्यात यावा.

३. वरीलप्रमाणे निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आलेला आहे त्याच प्रयोजनाखाली खर्ची करण्यात यावा. तसेच सदर कामाच्या प्रगतीचा आढावा नियमितपणे संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी यांनी घेऊन त्याबाबतचा अहवाल आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना सादर करावा.

४. सदरचा निधी शासनाच्या विहित धोरणानुसार व कार्यपध्दतीनुसार तसेच उपलब्धतेनुसार खर्च करणे आवश्यक राहील, याची जबाबदारी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांची राहील.

५. सदर निधीच्या खर्चाबाबत उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत सादर करण्याची जबाबदारी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११२११५३४३२९५३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694,
serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2019.11.21 15:37:32 +05'30'

(ला.रा. गुजर)

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. सचिव, महिला व बाल विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य,नवी मुंबई
३. आयुक्त, महिला व बाल विकास ,पुणे
४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
५. सर्व विभागीय उप आयुक्त,महिला व बाल विकास विभाग
६. सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास), जिल्हा परिषद
७. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी प्रकल्प)
८. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
९. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व परिक्षा), मुंबई / नागपूर
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११. निवड नस्ती (का-६).